**कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) ताराचंद खंडूजी कामडी, सहा.शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२२/प्र.क्र.६१/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १९ जुलै, २०२३

**संदर्भ:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दि.१४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) इंन्सिडेंट कमांडर तथा तहसिलदार, उमरेड यांचे क्र.मसीयु/१२६१/२०२१, दि.३०.०३.२०२१ चे आदेश.
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/विमा कवच/ सहाय्य/कामडी/२०२१-२२/टि ७/२०३९, दिनांक ३०.०३.२०२२
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. शिसंमा/२०२३/ टि ७/कोव्हीड-१९/विमा कवच/ सहाय्य/टीकेकामडी/२१८, दिनांक ११.०१.२०२३ व दि.२२.०६.२०२३

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) ताराचंद खंडूजी कामडी, सहा.शिक्षक यांचा कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोविड-१९ मुळे दिनांक १७.०४.२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) ताराचंद खंडूजी कामडी, सहा.शिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) व (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) ताराचंद खंडूजी कामडी, सहा.शिक्षक पदावर अशोक कन्या विद्यालय, उमरेड, जि.नागपूर येथे दिनांक ०१.१०.२००२ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) कामडी हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी ४५ वर्षावरील व्याधीग्रस्त नागरीकांचे कोविड लसीकरण करण्यासाठी

सर्वेक्षण पथक, उमरेड येथे कोविड-१९ बाबत अनुषंगिक कामकाज केले आहे. सदर बाब इंन्सिडेंट कमांडर तथा तहसिलदार, उमरेड यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) कामडी यांचा कोविड-१९ मुळे दिनांक १७.०४.२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे आचार्य विनोबा भावे ग्रामीण रुग्णालय, सावंगी (मेघे), वर्धा यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. ग्रामपंचायात, सावंगी (मेघे), ता.जि.वर्धा यांचेकडील कै. (श्री.) कामडी यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

७. इंन्सिडेंट कमांडर तथा तहसिलदार, उमरेड, तसेच, वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, उमरेड व आचार्य विनोबा भावे ग्रामिण रुग्णालय, सावंगी (मेघे), वर्धा यांनी प्रमाणित केल्यानुसार व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी कागदपत्रांची पडताळणी करुन प्रस्ताव सादर केल्यानुसार कै.(श्री.) ताराचंद कामडी यांनी कायदेशीर वारस म्हणून वारस (१) श्रीमती सुषमा ताराचंद कामडी, (२) कु.अस्तिका ताराचंद कामडी, व (३) श्री.अथर्व ताराचंद कामडी यांना एकत्रित रु. ५०.००लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वंकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०४/२०२१/व्यय ९, दिनांक २७.०५.२०२१ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, (००) (०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१-सहायक अनुदान (वेतनेतर)."

९. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०७१९१५११५४५०२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.07.19 15:13:30 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), नागपूर

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती सुषमा ताराचंद कामडी, रा.प्लॉट नं.५३, गिरडकर लेआउट, वार्ड नं. २०, उमरेड, ता.उमरेड, जि.नागपूर
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ६१/२०२२)